माजी विधानमंडळ सदस्यांना रेल्वे / विमान
प्रवास खर्चाच्या प्रतिपुर्तीबाबत.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग मंत्रालय,
मुंबई - ४०० ०३२.
शासन परिपत्रक क्र. संकीर्ण - १००९ / प्र क्र. ६२/कोषा प्र - ५
दिनांक : ४ मार्च, २०१०.

संदर्भ :- १. शासन निर्णय : संसदिय कार्य विभाग क्र. सुविधा - १०९७/मुमंस - ५३ / प्र. क्र. ४७/दोन, दि. २३.२.२०००
२. शासन निर्णय : संसदिय कार्य विभाग क्र. सुविधा - १०९७/मुमंस - ५३ / प्र. क्र. ४७/दोन, दि. २७.३.२०००
३. शासन निर्णय : संसदिय कार्य विभाग क्र. सुविधा - १०/२०००/२४४/प्र क्र. ६ /दोन, दि. ८.६.२०००
४. शासन निर्णय : संसदिय कार्य विभाग क्र. सुविधा - १०/२०००/४६४/प्र क्र. १४ /दोन, दि. ४.४.२००१
५. शासन निर्णय : संसदिय कार्य विभाग क्र. सुविधा - २००५/प्र क्र. १३४ /दोन, दि. २७.१२.२००७
६. शासन निर्णय : संसदिय कार्य विभाग क्र. सुविधा - २००८/प्र क्र. १५ /दोन, दि. ४.७.२००८.
७. शासन निर्णय : संसदिय कार्य विभाग क्र. सुविधा - २००८/प्र क्र. ४८ /दोन, दि. २.३.२००९.

प्रस्तावना :

उपरोक्त संदर्भाधिन शासन निर्णयातील क्रमांक ७ वरील शासन निर्णयान्वये महाराष्ट्रातील विधानमंडळ सदस्यांना विनामुल्य रेल्वे प्रवासाच्या सवलती प्रदान करण्यासाठी कोषागार अधिकारी / उप कोषागार अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित केलेले आहे.

या शासन निर्णयानुसार प्रतिपूर्ती मिळण्याबाबत, बऱ्याच माजी विधानमंडळ सदस्यांना अडचणी येत असल्याच्या तक्रारी सदस्यांकडून विधानमंडळ सचिवालयास प्राप्त होत आहेत. माजी विधानमंडळ सदस्यांना सदर सवलतीचे प्रदान यथाशिघ्र व्हावे तसेच तक्रारीस कोणताही वाव राहू नये यासाठी पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्याचे शासनाने ठरविले आहे.

परिपत्रक :

सर्व कोषागार अधिकारी / उप कोषागार अधिकारी यांना दिनांक ०२ मार्च २००९ च्या शासन निर्णयाद्वारे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित केले आहे. सदरची प्रदाने वेळेवर होण्याच्या दृष्टीने संबंधित सदस्यांनी रेल्वे प्रवासासंबंधीचे परिपूर्ण व बिनचूक आवश्यक कागदपत्र / आवश्यक उपप्रमाणके सादर केल्यास तातडीने देयक तयार करुन प्रदान करावे. परिपूर्ण कागदपत्र सादर झाल्यानंतर जास्तीत जास्त ३० दिवसांचे आत त्याचे प्रदान करण्याची जबाबदारी संबंधित कोषागार अधिकारी / उप कोषागार अधिकारी यांची राहील. असे न झाल्यास संबंधित कोषागार / उपकोषागार अधिकारी शिस्तभंग विषयक कार्यवाहीस पात्र ठरतील याची नोंद घ्यावी.

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००३०६१२४९५६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

(स. अ. मु. नकवी)
उप सचिव, वित्त विभाग

प्रती:-

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) I, मुंबई
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) II, नागपूर
३. महालेखापाल (लेखा परिक्षा) I, मुंबई
४. महालेखापाल (लेखा परिक्षा) II, नागपूर
५. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
६. सर्व विभागीय आयुक्त
७. सर्व जिल्हाधिकारी
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी व उप कोषागार अधिकारी
११. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१२. संसदीय कार्य विभाग, कार्यासन - २
१३. निवड नस्ती, कोषा प्र - ५

---------